**अलिबाग, जिल्हा रायगड येथे नाट्यगृह बांधकामासाठी दुसऱ्या टप्प्यातील ऊर्वरित निधीस वित्तीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: नागृबा-२०२४/प्र.क्र.२०/सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३०
दिनांक : ०३ जून, २०२५

**वाचा :** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.नागृबा-२०१५/प्र.क्र.८५/ सां.का.१, दि.२९.०२.२०१६
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.नागृबा-२०२४/प्र.क्र.२०/ सां.का.१, दि.२५.०९.२०२४
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.नागृबा-२०२४/प्र.क्र.२०/ सां.का.१, दि.१२.०२.२०२५
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.नागृबा-२०२४/प्र.क्र.२०/ सां.का.१, दि.३१.०३.२०२५

**प्रस्तावना :**

उपनिर्दिष्ट क्र.१ अन्वये, जिल्हास्तरावर नाट्यगृह बांधकाम करण्यासाठी अर्थसहाय्य करण्याबाबतची योजना कार्यरत आहे. त्यानुसार एक विशेष बाब म्हणून पी.एन.पी. सहकारी सांस्कृतिक कला विकास मंडळ, अलिबाग या सहकारी संस्थेच्या नाटयगृहाच्या बांधकामासाठी रुपये ९,१४,२५,८१६/- इतक्या रक्कमेस संदर्भ क्र. २ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर नाट्यगृहाच्या बांधकामास संदर्भ क्र.१ मधील तरतूदीनुसार पहिल्या टप्प्यातील निधी संदर्भ क्र.३ अन्वये वितरित करण्यात आला असून दुसऱ्या टप्प्यात वितरित करण्यात येणाऱ्या निधीपैकी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध निधी संदर्भ क्र.४ अन्वये वितरित करण्यात आला आहे. आता, दुसऱ्या टप्प्यातील ऊर्वरित निधी रुपये ३,७२,८३,२३४/- इतकी रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

पी.एन.पी. सहकारी सांस्कृतिक कला विकास मंडळ, अलिबाग या सहकारी संस्थेमार्फत उभारण्यात येणाऱ्या नाटयगृहाच्या दुसऱ्या टप्प्यातील बांधकामासाठी ऊर्वरित रक्कम रुपये ३,७२,८३,२३४/- (रुपये तीन कोटी बहात्तर लक्ष त्र्याऐंशी हजार दोनशे चौतीस फक्त) इतक्या निधीस पुढील अटींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे:-

१. शासन निर्णय दि. २५ सप्टेंबर, २०२४ अन्वये विहीत केलेल्या सर्व अटी व शर्तींचे पालन करणे जिल्हाधिकारी, रायगड यांना बंधनकारक राहील.
२. वितरीत करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम खर्च केल्याचे सनदी लेखापालांनी प्रमाणित केलेले विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र तसेच कामाचे भौतिक साध्य याबाबतची माहिती नियंत्रक अधिकारी म्हणजेच जिल्हाधिकारी, रायगड यांनी सादर केल्यांनतर शासनाच्या हिश्याच्या पुढील अर्थसहाय्याची रक्कम वितरीत करण्यात येईल.
३. निधी वितरण व खर्च याबाबतचा अनुपालन अहवाल जिल्हाधिकारी, रायगड यांनी शासनास पाठवावा.
४. सदरचा निधी इतर कोणत्याही प्रयोजनार्थ वापरता येणार नाही.

५. सांस्कृतिक कार्य विभागाच्या कार्यक्रमांसाठी वर्षातून दहा दिवस (सलग अथवा टप्प्या-टप्प्याने) सदर नाट्यगृह विनामुल्य उपलब्ध करुन देणे संबंधित यंत्रणेस बंधनकारक असेल.
६. सदर शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचे विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र सदर नाट्यगृहाच्या तिसऱ्या हप्ताच्या मागणीच्या प्रस्तावासह जिल्हाधिकारी, रायगड यांनी सादर करणे आवश्यक आहे.
७. या प्रयोजनार्थ कोणत्याही कारणास्तव प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिकचा निधी शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.
८. या नाट्यगृहाची देखभाल, दुरुस्ती, आधुनिकीकरण इत्यादी बाबींवर होणारा खर्च संबंधित संस्थेने यांच्याकडील उपलब्ध होणाऱ्या स्त्रोतातून करण्यात यावा.

०२. जिल्हाधिकारी, रायगड हे नियंत्रक अधिकारी राहतील व त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास यासंबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७ एप्रिल, २०२५ अन्वये विहीत केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, रायगड यांची असेल. या परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती (००) १०२-कला व संस्कृती प्रचालन (०१) (०२) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे (२२०५ १४८१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ च्या अर्थसंकल्पित वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान सशर्त आहे.

०५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक३१९/का.१४४३, दि.१४.०५.२०२५, आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७५/२०२५/व्यय-१५, दि.३०.०५.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०६०३१८०००२२१२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Tourism and Cultural Affairs, 2.5.4.20=D34FA92FD12DD57B9647DBD172129B5C0EB8B1CD7FF442B988313 11214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC 3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.06.03 18:00:54 +05'30'

**(अनिरुध्द सु. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. जिल्हाधिकारी, जिल्हा-रायगड.
४. उप सचिव (सां.का.१), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई

५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - यांना विनंती करण्यात येते की, सदर शासन निर्णयातील निधी जिल्हाधिकारी, रायगड यांना वितरीत करण्यात यावा.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
१०. वित्त विभाग (व्यय-१५), मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती